१४ व्या केंद्रीय वित्त आयोगांतर्गत कार्यरत न्यायालयांचे नुतनीकरण
(Redesigning of Existing Courts)
जिल्हा व सत्र न्यायालय नांदेड यांच्या नियंत्रणाखालील कंधार, जिल्हा नांदेड येथील न्यायालयीन इमारतीच्या दुरुस्तीस / नुतनीकरणास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.

# महाराष्ट्र शासन
## विधि व न्याय विभाग
### शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण २०१६/प्र.क्र.१८३(६)/का.१२

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
तारीख : ३ ऑगस्ट, २०१७

**वाचा -**

१ शासन निर्णय, विधि व न्याय विभाग क्रमांक : चौविआ १२१६/प्र.क्र.१०७/१६/का-९, दिनांक १० नोव्हेंबर, २०१६

२ शासन निर्णय विधि व न्याय विभाग क्रमांकः चौविआ १२१६/प्र.क्र.१०/का.नऊ, दिनांक १२ जून, २०१७

३ प्रबंधक (निरीक्षणे २) यांचे पत्र क्रमांक B(W) ६०४९/२०१०/२४२८,दिनांक १ सप्टेंबर, २०१६.

**प्रस्तावना -**

१४ व्या केंद्रीय वित्त आयोगाने शिफारस केलेल्या "न्याय व्यवस्थेचे सक्षमीकरण" (Strengthening the Justice Sector) या प्रयोजनासाठी सन २०१५-२०१६ ते २०१९-२०२० या ५ वर्षांच्या कालावधीकरीता महाराष्ट्र राज्यासाठी रुपये १०१४ कोटी इतका निधि नमूद केलेला आहे. १४ व्या केंद्रीय वित्त आयोगांतर्गत कार्यरत न्यायालयांचे नुतनीकरण या घटकासाठी ५ वर्षांच्या कालावधीकरीता रुपये २२८ कोटी इतका निधी दर्शविलेला आहे. या वित्त आयोगाने केलेल्या शिफारशींची कार्यक्षम अंमलबजावणी करण्यासाठी दिनांक ९ मार्च, २०१६ रोजी उच्चस्तरीय संनियंत्रण समिती गठीत करण्यात आलेली आहे. सदर समितीच्या बैठकीमध्ये मा.उच्च न्यायालयाकडून प्राप्त झालेल्या कृती आराखड्यास तत्वत: मान्यता देण्यात आली असून संदर्भाधीन दिनांक १२ जून, २०१७ रोजीच्या शासन निर्णयान्वये वित्त विभागाच्या सहमतीने १४ व्या केंद्रीय वित्त आयोगांतर्गत न्यायालयीन इमारतीच्या दुरुस्तीच्या कामांना रुपये ५० लक्ष मर्यादेपर्यंत प्रशासकीय मान्यता देण्याचे अधिकार प्रशासकीय विभागास देण्यात आले आहेत. त्या अनुषंगाने जिल्हा व सत्र न्यायालय नांदेड, जिल्हा नांदेड यांच्या नियंत्रणाखालील कंधार येथील न्यायालयांच्या नुतनीकरणाचे सन २०१५-१६ च्या दरसूचीवरील प्रस्ताव उपरोक्त संदर्भ क्रमांक ३ येथे नमूद पत्रान्वये मा.उच्च न्यायालय मुंबई यांचेकडून शासनास प्राप्त झाले आहेत. सदर अंदाजपत्रक सार्वजनिक बांधकाम विभागाच्या संबंधित उप विभागीय अभियंता यांनी तयार केले असून संबंधित कार्यकारी अभियंता तसेच, प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधिश नांदेड यांनी साक्षांकीत केले आहे.

त्या अनुषंगाने जिल्हा व सत्र न्यायालय नांदेड यांच्या नियंत्रणाखालील कंधार, जिल्हा नांदेड येथील न्यायालयीन इमारतींच्या १४ व्या केंद्रीय वित्त आयोगांतर्गत नुतनीकरणाच्या कामांस प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय –

१४ व्या केंद्रीय वित्त आयोगांतर्गत राज्यातील न्यायालयांचे नुतनीकरण (Redesigning of Existing Courts) या कामांच्या मा.उच्च न्यायालय मुंबई यांचेकडून प्राप्त झालेल्या; जिल्हा व सत्र न्यायालय नांदेड यांच्या नियंत्रणाखालील कंधार, जिल्हा नांदेड येथील न्यायालयीन इमारतीच्या नुतनीकरणासाठी रुपये ४९,०६,६२३/- (रुपये एकोणपन्नास लक्ष सहा हजार सहाशे तेवीस फक्त ) इतक्या किंमतीच्या अंदाजपत्रकांना प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे. त्याचा तपशील खालीलप्रमाणे आहे:

**न्यायालयीन इमारत कंधार , जिल्हा नांदेड**

| अ.क्र. | १४ व्या केंद्रीय वित्त आयोगांतर्गत प्रस्तावित कामे | कामाचा अंदाजित खर्च |
|---|---|---|
| | Renovation of Court Building at Kandhar | |
| १ | A) To make arrangement that the accused and vulnerable witness shall not come face to face at any point of time<br>B) Construction of closed cubicle for accused having one way glass | १,६६,५२९ |
| २ | Establishing Vulnerable Witness Deposition Centre<br>A) Video Conferencing | १,००,०००<br>५,००,००० |
| ३ | Making Witness Box Adaptable to Wheel Chairs | ६,००० |
| ४ | Braille symbol and auditory signals in elevators and toilets | ५०,००० |
| ५ | (1) Barrier free Courts and Court Rooms for Persons with Disabilities<br>(2) Cost of Civil Works | ५०,०००<br>३१,१८,०३७ |
| ६ | Electrification -<br>(1) Add for Electrification<br>(2) Add for Air Conditioning<br>(3) Add for C.C.T.V. | १,००,०००<br>१,५०,०००<br>१,००,००० |
| ७ | Sanitation Facilities – Water Supply | १,२०,००० |
| | एकूण | ४४,६०,५६६ |
| | Add for 6% Service Tax | २,६७,६३४ |
| | Add for 4% Contingencies | १,७८,४२३ |
| | **एकूण**<br>**अक्षरी रुपये एकोणपन्नास लक्ष सहा हजार सहाशे तेवीस फक्त** | **४९,०६,६२३** |

२. जिल्हा व सत्र न्यायालय नांदेड यांच्या नियंत्रणाखालील कंधार, जिल्हा नांदेड येथील न्यायालयीन इमारतींच्या नुतनीकरणाचा खर्च "मागणी क्रमांक जे-१, २०१४ न्यायदान, (००) न्यायदान, १०२- उच्च न्यायालये, (११) कार्यरत न्यायालयांचे नविनीकरण, (११)(०१) कार्यरत न्यायालयाचे नविनीकरण (२०१४ ०५४८)" या लेखाशीर्षाखाली सन २०१७-१८ या आर्थिक वर्षात मंजूर तरतुदीतून भागविण्यात यावा.

३. सदर कामाची निविदा मागविण्यापूर्वी मा.उच्च न्यायालय मुंबई यांनी निश्चित केलेला कृती आराखडा व Dedicated Cell ने निश्चित केलेल्या कामांमधीलच उपरोक्त कामे असल्याची खातरजमा करण्याची जबाबदारी प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधिश नांदेड यांची राहील. प्रचलित कार्यपद्धतीचा अवलंब करुन ई-निविदा प्रक्रीया सार्वजनिक बांधकाम विभागाकडून राबविण्यात यावी व या प्रशासकीय मान्यतेच्या अनुषंगाने इतर अनुषंगिक कार्यवाही पूर्ण करावी.

४. हा शासन निर्णय सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अनौ.सं.क्र.४०४/इमा-२, दिनांक २१.११.२०१६ अन्वये व त्या विभागाच्या सहमतीने तसेच, शासन निर्णय, विधि व न्याय विभाग दिनांक १२.०६.२०१७ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांच्या अधीन राहून निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०८०३१७०१५३६२१२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Bhagyashree Rajendra Bhaidkar

Digitally signed by Bhagyashree Rajendra Bhaidkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Law And Judiciary Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d567849462918ceb7579bb2b56247e927c039bbdf028022a8b9ce837a7c854bb, serialNumber=fb84fefefe4ee219c1bc35b35201c14eab0903e8194a7413a74eed93f32afdb0, cn=Bhagyashree Rajendra Bhaidkar
Date: 2017.08.03 16:53:13 +05'30'

**( भाग्यश्री भाईडकर )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा.राज्यपालांचे सचिव,
२. मा.मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,
३. मा.विरोधी पक्षनेता, विधान परीषद / विधान सभा
४. प्रबंधक (निरीक्षणे १), मा.उच्च न्यायालय, अपिल शाखा, मुंबई,
५. प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधिश, नांदेड,
६. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता-१/२), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,

७. महालेखापाल (लेखा परीक्षा)-१/२, महाराष्ट्र मुंबई / नागपूर,

८. वित्त विभाग (व्यय-५), मंत्रालय,

९. सार्वजनिक बांधकाम विभाग (इमा-२), मंत्रालय, मुंबई,

१०.जिल्हा कोषागार अधिकारी नांदेड,

११.उप जिल्हा कोषागार अधिकारी नांदेड,

१२. विधि व न्याय विभाग (का.९/२३), मंत्रालय, मुंबई

१३. निवडनस्ती (का.१२)